**सन २०२२-२३ व सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षाच्या आरटीई २५ टक्के प्रवेश प्रक्रीयेकरीता घेण्यात गुगल एपीआय सेवेच्या अनुषंगाने देयकाची रक्कम अदा करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: ईगव्ह ०२२४/प्र.क्र.०२/ संगणक**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

विस्तारीत इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक:-०५ मार्च, २०२४.

**वाचा:-**

शिक्षण संचालक, प्राथमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. प्राशिसं /गुगल एपीआय/आरटीई/टे-८०१/२०२४/००५४६, दि.१८.०१.२०२४.

**प्रस्तावना :-**

बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ मधील कलम १२ (१) (सी) नुसार खाजगी विनाअनुदानित शाळांमध्ये प्रवेश स्तरावर २५ टक्के जागा वंचित व दुर्बल घटकातील बालकांसाठी राखीव ठेवण्याची तरतूद आहे. सन २०१६-१७ पासून आरटीई २५ टक्के प्रवेश प्रक्रीया ऑनलाईन पध्दतीने राबविण्यात येत आहे. उक्त प्रवेश प्रक्रीयेचा अर्ज ऑनलाईन पदधतीने भरण्याकरीता अर्जदाराचा निवासी पत्ता ते इच्छुक शाळेमधील अंतर निश्चित करण्याकरीता एपीआय सेवा गुगल यांचेकडून घेण्यात येते. सदर सेवेबाबत आरटीई प्रवेश प्रक्रीयेची निकड विचारात घेऊन सन २०२२-२३ व सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षाच्या आरटीई २५ टक्के प्रवेश प्रक्रीयेकरीता गुगल एपीआय ची सेवा घेण्यात आली आहे. त्यानुषंगाने, सन २०२२-२३ आणि २०२३-२०२४ या शैक्षणिक वर्षाच्या आरटीई २५ टक्के प्रवेश प्रक्रीयेकरीता गुगल एपीआय ची घेण्यात आलेल्या सेवेकरीता अनुक्रमे एकूण रु.१४,४३,९०२ व एकूण रु.१५,७४,९७८ असे एकूण ३०,१८,८८० (तीस लाख अठरा हजार आठशे ऐंशी रुपये फक्त) यास प्रशासकीय मान्यता देऊन सदर रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

शिक्षण संचालक, प्राथमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधीन पत्रान्वये केलेल्या विनंतीनूसार सन २०२२-२३ आणि २०२३-२०२४ या शैक्षणिक वर्षाच्या आरटीई २५ टक्के प्रवेश प्रक्रीयेकरीता गुगल एपीआय ची घेण्यात आलेल्या सेवेकरीता अनुक्रमे एकूण रु.१४,४३,९०२ व एकूण रु.१५,७४,९७८ असे एकूण ३०,१८,८८० (तीस लाख अठरा हजार आठशे ऐंशी रुपये फक्त ) एवढी रक्कम वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च मागणी क्रमांक ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ८०-सर्वसाधारण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) (५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम (२२०२H४५४) ३१ सहाय्यक अनुदाने या लेखाशिर्षातून सन २०२३-२४ च्या उपलब्ध तरतुदीमधून भागविण्यात यावा. यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक व सहायक संचालक, (लेखा) माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण संचालनालय, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका २०१५ दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील उपविभाग- २ मधील अनुक्रमांक २७ अ मधील नियम क्र. ७६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५४९/व्यय-५, दिनांक ०२.०६.२०२३ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०५१६२४२९५६२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIVEK GULABRAO SAPKAL

Digitally signed by VIVEK GULABRAO SAPKAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=55c54ce6c9bede7daecd096d20450a76c60783cb131837 4f8764a2da64d548a5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=50EDF35541F970C25C79ED803C981C8C9EBC19E2 7CDBAD124BB5C63AA9962A6B, cn=VIVEK GULABRAO SAPKAL
Date: 2024.03.05 16:33:27 +05'30'

**( विवेक सपकाळ )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा.अ.मु.स. वित्त विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२) मा.अ.मु.स. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३) मा.प्र.स.माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) शिक्षण संचालक, प्राथमिक शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर१/२.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर१/२.
८) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
९) निवडनस्ती/संगणक कार्यासन.